सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या कार्यालयातील कार्यक्रम अधिकारी (गट-ब) (राजपत्रित) या पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२२/प्र.क्र.१४५/सां.का.४
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : १५ मार्च, २०२४

**वाचा :-** १) शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य व विशेष सहाय्य विभाग क्र. संकीर्ण २००१/प्र.क्र.२९८/सां.का.१, दिनांक २३ मार्च, २००६
२) शासन अधिसूचना, पर्यटन व सांस्कृतिक विभाग क्र. सांकासं-२०१२/ प्र.क्र.५९/सां.का.४, दिनांक ९ जून, २०१४
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१६/ प्र.क्र.२९०/कार्या. १२, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१६
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/कार्यासन १२, दिनांक १ ऑगस्ट, २०१९
५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ७ मे, २०२१

**प्रस्तावना :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अखत्यारीतील सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयात उपर्निर्दिष्ट क्र. १ अन्वये "कार्यक्रम अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)" हे पद आकृतिबंधात मंजूर करण्यात आलेले आहे. उपर्निर्दिष्ट क्र. २ अन्वये, "कार्यक्रम अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)" पदावरील नेमणुकीबाबत नियम ठरविण्यात आलेले आहे. त्यानुषंगाने संचालनालयातील "कार्यक्रम अधिकारी (गट-ब) (राजपत्रित)" ही दोन पदे पदोन्नतीने भरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या अखत्यारीतील सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई या क्षेत्रिय कार्यालयातील अधीक्षक, गट-ब (अराजपत्रित) (वेतनश्रेणी एस-१३ - ३५,४०० - १,१२,४००) या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना कार्यक्रम अधिकारी (वेतनश्रेणी एस-१५ - ४१,८०० - १,३२,३००) या संवर्गात या शासन निर्णयान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे पद | पदोन्नती नंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | श्री. निलेश ज्ञानेश्वर धुमाळ | कार्यक्रम अधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई | सांस्कृतिक कार्य संचालनालय मुख्यालय येथील कार्यक्रम अधिकारी या रिक्त पदी. |

२. वरील अधिकारी यांना देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

अ) मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/ २०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दिनांक २५ मे, २००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि/१६-ब कार्यासनाच्या दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार सदर मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दिनांक ७ मे, २०२१ च्या शासन निर्णया प्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आले असून त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून सदर मान्यता देण्यात येत आहे.

ब) दिव्यांग कर्मचाऱ्यांना गट-अ व गट-ब मधील पदांवर पदोन्नतीबाबत मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील दाखल रिट याचिका स्टँप ६८१९/२०२१, दिनांक ८ जुलै, २०२१ व दिनांक २२ जुलै, २०२१ रोजी दिलेल्या आदेशाच्या अधीन राहून सदर निवडसूचीस व पदोन्नतीस मान्यता देण्यात येत आहे.

क) सदर पदोन्नती निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीच्या परिणामी निवडसूचीतील अधिकाऱ्यास नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही. तसेच सदर निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

ड) निवडसूचीतील अधिकाऱ्याने सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १ ऑगस्ट, २०१९ च्या शासन निर्णयात विहित केलेल्या पदोन्नतीच्या निकषांची पूर्तता केलेली आहे, या अटीच्या अधीन राहून सदर निवडसूचीस मान्यता देण्यात येत आहे.

ई) सदर तात्पुरती पदोन्नती, हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येईल.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०३१६११३६००४३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2024.03.16 11:47:00 +05'30'

**( बाळासाहेब ई. सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१.मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२.सचिव (सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३.उप सचिव ( सां.का.४) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४.संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई
५.श्री. निलेश धुमाळ, अधिक्षक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. सर्व अवर सचिव / सर्व कार्यासन अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई

१०. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
११. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१३. निवड नस्ती, सां.का.४.